**सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीत रुग्णालयामध्ये सी.सी.टी.व्ही कॅमेरे बसविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.४८/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ४ मार्च, २०२०.

वाचा :

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.४८/आरोग्य ३ दि. ०४.०५.२०१९**

२) **सहसंचालक आरोग्य सेवा, मुंबई पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-३/संकीर्ण/सीसीटीव्ही/११८३५-३६ दि.२२.०८.२०१९**

३) **सहसंचालक आरोग्य सेवा, मुंबई पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-३/संकीर्ण/सीसीटीव्ही/१४७६८-६९ दि.२७.१२.२०१९**

**प्रस्तावना:**

राज्यातील एकूण ३८९ रुग्णालयासाठी एकूण १३६० सी.सी.टि.व्ही. कॅमेरे व २६६ सी.सी.टी.व्ही सिस्टीम बसविण्याबाबतचा एकूण रु. ४,०२,००,०००/- च्या प्रस्तावास उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये शासन निर्णयातील अटी व शर्तीमधील अ.क्र.७ वर खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंरतरच पुरवठा अदेश निर्गमित करण्यांत यावेत, अ.क्र.८ वर सदर खरेदी राज्यसतरावरुन ई-निविदा प्रक्रिया राबवून करण्यांत यावी असे नमूद केले आहे. ३८९ आरोग्य संस्थांपैकी २६६ ठिकाणी नव्याने सी.सी.टी.व्ही सिस्टीम कॅमेऱ्यांसह स्थापित करावयाची आहे, तर उर्वरीत १२३ ठिकाणी सी.सी.टी.व्ही. सिस्टीम कार्यान्वित असल्याने त्या ठिकाणी कॅमेरे खरेदी करावयाचे आहे. ज्या ठिकाणी फक्त कॅमेरे खरेदी करावयाचे आहेत त्या ठिकाणी राज्य स्तरावरुन खरेदी करण्यांत येणारे कॅमेरे हे कार्यान्वित असलेल्या सी.सी.टी.व्ही. सिस्टीमध्ये मॅच होणार नाहीत. तसेच, शासन निर्णयामध्ये अ.क्र.९ वर सी.सी.टी.व्ही सिस्टीम व कॅमेऱ्यांचा खर्च रु.४०,०००/- पर्यंतचा खर्च संबंधित रुग्णालयाच्या रुग्ण कल्याण समितीकडील निधीमधून व उर्वरीत खर्च संबंधित रुग्णालयाच्या स्वीय प्रपंजी खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यांत यावा असे नमूद केले आहे. त्यामुळे ३८९ संस्थांची खरेदी एकत्रित संचालनालय स्तरावरुन होवून, पुरवठाधारकास ३८९ ठिकाणी मशीन स्थापित करण्याकरीता व देयकाकरीता जावे लागणार आहे. त्यामुळे तांत्रिक अडचणी येणार असल्यामुळे सदर खरेदी जिल्हा शल्य चिकित्सक स्तरावर करण्यास व त्यासाठी लागणारा निधी रुग्ण कल्याण समितीमध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून व जिल्हा आरोग्य सोसायटी मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून भागाविण्यास मान्यता देययाचा आरोग्य सेवा संचालनालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

उपरोक्त क्र. १) येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे सी.सी.टी.व्ही कॅमेरा व सी.सी.टी.व्ही. सिस्टीमची खरेदी राज्यस्तरावरुन करण्याऐवजी जिल्हा शल्य चिकित्सक स्तरावरुन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सी.सी.टी.व्ही कॅमेरे व सी.सी.टी.व्ही सिस्टीम खरेदी रुग्ण कल्याण समितीमधील निधीमधून करावयाची झाल्यास संबंधित आरोग्य संस्थेने रुग्ण कल्याण समितीची मान्यता घेण्यांत यावी. रुग्ण कल्याण समितीच्या मान्यतेनंतर पुरवठा आदेश देण्यात यावेत. तसेच सदर खरेदी जिल्हा आरोग्य सोयायटी निधीमधून करावयाची झाल्यास जिल्हा कार्यकारी समितीची मान्यता घेण्यांत यावी. खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर जिल्हा कार्यकारी समितीची मान्यतेनंतर पुरवठा आदेश देण्यात यावेत त्यानुसार आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०४१७०१३५२७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.04 18:04:23 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील )**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई.
५. सर्व उपसंचालक आरोग्य सेवा.
६. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.
७. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).